**स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविल्या जाणारी बंद पडलेली/मान्यता रद्द केलेली/ स्वेच्छेने बंद केलेली तसेच सध्या कार्यरत असलेली अनुसूचित जातीची अनुदानित वसतिगृहे अन्य स्वयंसेवी संस्थेस हस्तांतरण व स्थलांतरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०१७/प्र.क्र.२७९/शिक्षण-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२
दिनांक : २८ जून, २०१८.

वाचा :-

१. समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्रमांक क्र. बीसीएच-१०९७ /प्र.क्र.१०७/मावक-४, दि. १६ मार्च, १९९८
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन शुध्दीपत्रक क्र. बीसीएच-२०००/ प्र.क्र.२९७/ मावक-४, दि. ०१.०८.२००८
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१२/ प्र.क्र.३६४/ शिक्षण-२, दि. २६.११.२०१३
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१६/प्र.क्र.२७७/ शिक्षण-२, दि. १४.०७.२०१७

प्रस्तावना :-

राज्यात सामाजिक न्याय विभागांतर्गत अनुसूचित जातीच्या मुलांसाठी १८१६ व मुलींसाठी ५७२ अशी एकूण २३८८ अनुदानित वसतिगृहे कार्यान्वित आहेत.शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार काही स्वयंसेवी संस्था नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार उचित संधी देवूनही विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार/शासनाच्या ध्येयधोरणानुसार अनुदानित वसतिगृहे चालवित नसल्यास, सदर अनुदानित वसतिगृहांची मान्यता रद्द केली जाते. तसेच, काही कारणास्तव वसतिगृहे बंद पडतात, अशा बंद पडलेल्या राज्यातील अनुदानित वसतिगृहातील प्रवेशितांचे शैक्षणिक नुकसान होते व त्यांच्या प्रगतीचा उद्देश सफल होत नाही. त्यामुळे अशी मान्यता रद्द केलेली किंवा बंद पडलेली अनुदानित वसतिगृहे अन्य संस्थांना हस्तांतरण व स्थलांतरीत करण्यासाठी तसेच सध्या कार्यरत असलेली अनुदानित वसतिगृहे स्वेच्छेने अन्य ठिकाणी स्थलांतर व इतर संस्थेकडे हस्तांतर करण्यासाठी शासनाने उपरोक्त वाचा येथील क्र. १ ते ३ च्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी धोरण निश्चित केलेले आहे. दिनांक ३१.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वसतिगृह हस्तांतरण/स्थलांतरण बाबतचे सर्व प्रलंबित प्रस्ताव रद्द करण्यात आले असून, त्यानंतर वसतिगृह हस्तांतरण/स्थलांतरणाची प्रक्रिया स्थगित करण्यात आलेली आहे.

सामाजिक न्याय विभागातंर्गत कार्यरत असलेल्या अनुदानित वसतिगृहांपैकी बंद असलेली/मान्यता रद्द केलेली/स्वेच्छेने बंद केलेली तसेच सध्या कार्यरत असलेली अनुसूचित जातीची अनुदानित वसतिगृहे

अन्य स्वयंसेवी संस्थेस हस्तांतरण व स्थलांतरण करण्याबाबत मा. लोकप्रतिनिधी यांच्याकडून वारंवार विचारणा केली जात असल्याने तसेच संस्थाचालकांकडून हस्तांतरण व स्थलांतरण करुन मिळणेबाबत मोठ्या प्रमाणात प्रस्ताव प्राप्त होत असल्याने याबाबत असे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी असलेले अनुदानित वसतिगृह हे शासनाने वेळोवेळी लागू केलेल्या विहित अटी व शर्तीची पूर्तता न केल्यामुळे, मान्यता काढून घेतलेले अथवा रद्द केलेले किंवा काही कारणास्तव बंद पडलेले किंवा एखादी स्वयंसेवी संस्था स्वेच्छेने चालवू इच्छित नसल्याने बंद करण्यात आलेले अनुदानित वसतिगृह अन्य स्वयंसेवी संस्थेमार्फत सुरु करण्यासाठी किंवा त्यांचे हस्तांतरण व स्थलांतरण करण्यासंबंधीचे संदर्भाधीन अथवा यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले उपरोक्त वाचा येथील २, ३ व ४ क्रमांकाचे शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे निश्चित केलेल्या कार्यपध्दतीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**१. बंद/मान्यता रद्द करण्यात आलेली वसतिगृह अन्य संस्थेस हस्तांतरण करण्याची कार्यपध्दती :-**

१) बंद किंवा मान्यता रद्द झालेली वसतिगृह स्थलांतरीत/हस्तांतरीत करण्याकरिता त्या वसतिगृहातील विद्यार्थी संख्या विचारात घेणे आवश्यक नाही.

२) बंद किंवा मान्यता रद्द केलेल्या वसतिगृहांच्या ठिकाणांसहीत नावांची यादी विभागाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी आणि इच्छूक संस्था, एन.जी.ओ. यांच्याकडून अर्ज मागविण्यात यावेत. सदर संस्था ही राज्यातील नोंदणीकृत संस्था असावी, वसतिगृहाचे स्थलांतर राज्यातील कोणत्याही भागात आवश्यकता तपासून करण्यात येईल. अर्ज मागविण्याकरीता आयुक्त समाज कल्याण, पुणे यांच्याकडून प्रत्येक प्रादेशिक विभागात दोन स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देण्यात यावी व अर्ज प्रादेशिक उपायुक्त कार्यालयात सादर करण्यात यावेत. प्रादेशिक उपायुक्तांकडे प्राप्त अर्ज व प्रस्ताव आयुक्त समाज कल्याण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत छाननी समितीकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात यावी.

३) इच्छुक स्वयंसेवी संस्थेकडे संस्था नोंदणी अधिनियम १८६०, सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १९५० अंतर्गतचे नोंदणी प्रमाणपत्र असावे तसेच धर्मादाय आयुक्तांकडे या संस्थेची नोंदणी केलेली असावी व त्यात स्पष्टपणे शैक्षणिक कार्य किंवा वसतिगृह चालविण्याबाबतचे उद्देश असावेत.

४) संस्थेने नोंदणी प्रमाणपत्र, संस्थेच्या घटनेची प्रत सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन अर्जासोबत जोडावी. वसतिगृह चालविण्यासाठी इच्छूक असलेल्या संस्थेस, वसतिगृह/शैक्षणिक संस्था चालविण्याचा किमान ४ ते ५ वर्षाचा अनुभव असावा.

५) संस्थेने अर्ज करतांना आयुक्त, समाज कल्याण यांच्या नावाने रु. १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) एवढी रक्कम चलनाद्वारे भरणे आवश्यक आहे. (सदरची रक्कम ना परतावा असेल)

६) अर्ज करतांना संस्थेच्या बँक खात्यात किमान रु. ०३.०० लक्ष (रुपये तीन लक्ष फक्त) एवढी रक्कम जमा असणे आवश्यक आहे. यासाठी संबंधित बँकेचे प्रमाणपत्र अर्जासोबत जोडावे. संस्थेकडे एका वर्षासाठी खर्च करता येईल इतकी रक्कम त्यांच्या बँक बचत किंवा चालू खात्यावर शिल्लक असणे अनिवार्य आहे.

७) संस्थेने लगतच्या तीन वर्षातील लेखा परिक्षणाच्या अहवालाची साक्षांकित प्रत अर्जासोबत जोडावी.

८) वसतीगृह चालविण्याकरीता संस्थेस सुरुवातीचे तीन वर्ष इमारत भाडेकरार तत्वावर घेता येईल परंतु तीन वर्षानंतर संस्थेस इमारत बांधणे बंधनकारक राहील. सदर इमारतीसाठी नियमांनुसार इमारत भाडे अनुज्ञेय राहील. प्रति विद्यार्थी किमान ४० चौ.फूट प्रमाणे इमारतीचे क्षेत्रफळ असावे व आवश्यक भौतिक सुविधा उपलब्ध असाव्यात. प्रस्ताव दाखल करतेवेळी संस्थेच्या मालकीची/ भाडेतत्वावर तीन हजार चौ.फूट जागा असणे आवश्यक आहे.

९) संस्थेस धर्मादाय आयुक्तांनी किंवा शासनाने दंड केलेला असल्यास त्याबाबतची माहिती अर्जासोबत जोडावी. संस्थेच्या सुरु असलेल्या वसतिगृहातील गैरप्रकाराबाबत इतर विभागांनी संस्थेविरुध्द यापूर्वी केलेली कार्यवाही, याबाबतची माहिती द्यावी. संस्थेने यापूर्वी निधीचा अपहार केल्याच्या तक्रारी प्राप्त असल्यास त्याची माहिती द्यावी.

१०) संस्थेने यापूर्वी शासना विरुध्द मा. उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल केली होती किंवा कसे? असल्यास, ती प्रलंबित आहे का, किंवा निकाल लागला असल्यास त्याची माहिती द्यावी.

११) ज्या शैक्षणिक वर्षात अनुदानित वसतिगृहाची मान्यता रद्द करण्यात आलेली आहे, किंवा बंद करण्यात आलेले आहे त्या शैक्षणिक वर्षाच्या अखेरपर्यंत सदर वसतिगृह प्रशासकामार्फत चालू ठेवण्यात यावे. नवीन शैक्षणिक वर्ष सुरु होण्यापूर्वीच तेथील विद्यार्थ्यांचे नजीकच्या वसतिगृहात समायोजन करुन सदर वसतिगृह सक्षम स्वयंसेवी संस्थेस विहित कार्यपध्दतीनुसार हस्तांतरण करण्याची प्रक्रिया सुरु करावी.

**२. वसतिगृह मान्यता रद्द करण्याची सर्वसाधरण कारणे :-**

**अ)** गंभीर स्वरुपाच्या उणिवा किंवा गैरव्यवस्थापन या कारणास्तव दिनांक १६.०३.१९९८ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी-शर्ती नुसार मान्यता रद्द करण्यात आली असणे.

**ब)** अनुदानित वसतिगृहामध्ये मान्य संख्येएवढे प्रवेशित विद्यार्थी नसणे.

**क)** निवासी विद्यार्थ्यांना मानकानुसार भोजन, सोई-सुविधा पुरेशा प्रमाणात उपलब्ध करुन न देणे.

**ड)** संस्थेची आर्थिक स्थिती सुस्थितीत नसणे.

**इ)** विद्यार्थ्यांच्या निवासाकरीता स्वतंत्र, पुरेशी इमारत उपलब्ध करुन न देणे, तसेच पाणी, वीज,

स्वच्छतागृहे, स्नानगृहे इ. मुलभूत सुविधा शासन निर्णय दि. १६.०३.१९९८ नुसार उपलब्ध करुन न देणे.

**ई)** अनुदानित वसतीगृहाचे कामकाज शासनाच्या ध्येय धोरणाला बाधा येईल असे चालविणे अथवा शासनाच्या नियमांचे किंवा आदेशांचे पालन न करणे.

**उ)** अनुदानित वसतिगृहाच्या कामकाजावर व्यवस्थापनाच्या निष्काळजीपणामुळे उदभणाऱ्या गंभीर घटना, उदा. विद्यार्थ्यांचा मृत्यू, आत्महत्या, बलात्कार, लैंगिक अत्याचार, सर्पदंश, नरबळी, अपघात व या सारख्या अन्य घटना.

**ऊ)** अनुदानित वसतिगृहातील कर्मचाऱ्यांच्या आरक्षण बिंदू नामावलीचे अनुपालन न करता केलेल्या नियमबाह्य नियुक्त्या, मानधनातील अनियमितता.

**ए)** अनुदानित वसतिगृहातील कर्मचारी वर्ग व व्यवस्थापन यांचेमधील वाद/विवाद.

**ऐ)** राज्य शासनाचे/वरिष्ठ कार्यालयाचे आदेश न पाळणे, अंमलबजावणी अधिकारी/क्षेत्रीय अधिकारी यांना तपासणी दरम्यान अनुदानित वसतिगृहाचे अभिलेखे न दाखवणे किंवा खोटे/फसवे अभिलेखे तयार करुन शासनाचे अनुदान लाटण्याचा प्रयत्न करणे. विद्यार्थ्यांची गैरसोय करणे, चुकीची विद्यार्थी संख्या दाखवून जास्तीचे परिपोषण अनुदान घेणे किंवा अतिरिक्त कर्मचाऱ्यांची नियुक्ती करणे.

**ओ)** कोणत्याही अनुदानित वसतिगृहाचे हस्तांतरण अन्य नविन संस्थेकडे केल्यानंतर हस्तांतरण झालेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे समायोजन नवीन वसतिगृहात करण्यात येईल.

**३. काही ठिकाणी खालील कारणास्तव स्थलांतरण परवानगी दिली जाईल :-**

**१)** अनुदानित वसतिगृह ज्या ठिकाणी कार्यान्वित आहे अशा ठिकाणी सिंचन प्रकल्प अथवा इतर सार्वजनिक उपक्रम सुरु होणार असतील व त्यासाठी सदरच्या जागेचे अधिग्रहण कारणे आवश्यक असेल किंवा पूर, भुकंप इत्यादी सारख्या नैसर्गिक आपत्तीचा धोका असेल किंवा,

**२)** सध्या अनुदानित वसतिगृह ज्या ठिकाणी आहे त्या सभोवतालची अनेक गावे दुसरीकडे वसाहतीसाठी गेल्यामुळे किंवा इतर कारणांमुळे अनुदानित वसतिगृहाच्या परिसरातील असलेली लोकसंख्या कमी झाल्यामुळे अनुदानित वसितगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांची मान्य संख्या ५० टक्के पेक्षा कमी असल्यास किंवा

**३)** ज्या ठिकाणी अनुदानित वसतिगृह असेल त्या ठिकाणी मुलभूत सोयी-सुविधा इत्यादीबाबत गंभीर समस्या असल्यास किंवा जातीय तणाव, गटबाजीचा संघर्ष मोठ्या प्रमाणात वाढणे इत्यादी सारख्या सार्वजनिक अशांततेच्या घटना वारंवार घडल्यामुळे अनुदानित वसतिगृह आहे त्या ठिकाणापासून

त्या जिल्ह्यामध्येच किंवा सदर प्रकल्प बाधीत गांव ज्याठिकाणी पुनर्वसित होत आहे किंवा झाले आहे. अशा ठिकाणी शासन मान्यतेने स्थलांतरण करावे.

**४)** संस्थेस अनुदानित वसतिगृह चालू असलेल्या ठिकाणी वीज, पाणी, इमारत, मैदान किंवा अन्य स्थानिक अपुऱ्या सोयीमुळे किंवा स्थानिक प्रासंगिक कारणामुळे एखाद्या अनुदानित वसतिगृहाचे स्थलांतर त्याच अनुदानित वसतिगृहाच्या परिसरात १० कि.मी. चे अंतरावर करणे आवश्यक असल्यास वस्तुस्थितीचा अहवाल प्राप्त करुन घेऊन आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे शिफारशीनुसार शासनाच्या परवानगीने नवीन ठिकाणी संस्थेने केलेल्या मुलभूत सोयी-सुविधा विचारात घेऊन स्थलांतरास परवानगी देण्याबाबत विचार केला जाईल.

**५)** शासनाच्या मान्यतेशिवाय अनुदानित वसतिगृहाचे स्थलांतरण केल्यास ते अवैध ठरविण्यात येईल व त्यामुळे उदभवणारे विविध प्रश्न उदा. कर्मचारी, स्थावर जंगम मालमत्ता व विद्यार्थी संख्या याबाबत राज्य शासनाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही. त्यामुळे अशा परस्पर संबंधित अनुदानित वसतिगृहाची मान्यता आपोआप रद्द समजण्यात येईल. अशा रद्द झालेल्या अनुदानित वसतिगृहाचे अन्य संस्थेकडे हस्तांतरण करण्याचे अधिकार शासनास राहतील. सध्या कार्यरत असलेले अनुदानित वसतिगृह हे संस्थेकडून अन्य संस्थेकडे त्यांच्या परस्पर संमतीने हस्तांतरित करता येणार नाही. एखाद्या संस्थेस त्यांच्याकडील अनुदानित वसतिगृह चालविणे शक्य होत नसेल तर सदर संस्था त्यांचेकडील उपक्रम शासनास हस्तांतर करतील. त्यानंतर शासन उपरोक्त १ प्रमाणे त्यावर कार्यवाही करेल. कोणत्याही परिस्थितीत संस्थेने त्यांच्याकडील अनुदानित वसतिगृह अन्य संस्थेस हस्तांतरित केल्यास त्यास शासन मान्यता देणार नाही.

**राज्यस्तरीय छाननी समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, समाज कल्याण, पुणे | अध्यक्ष |
| २ | सहआयुक्त, (शिक्षण,) समाज कल्याण, आयुक्तालय | सदस्य |
| ३ | संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| ४ | सहाय्यक आयुक्त, (शिक्षण) समाज कल्याण, आयुक्तालय | सदस्य सचिव |

वरील प्रमाणे गठीत केलेल्या राज्यस्तरीय समितीने प्रादेशिक उपायुक्ताकडून प्राप्त झालेल्या प्रस्तांवाची तपासणी करुन दोन आठवडयात प्रस्ताव आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायासह शासनाकडे मान्यतेसाठी पाठवावेत.

**<u>सर्वसाधरण निर्देश</u> :-**

(१) राज्यस्तरीय समिती शासनास प्रस्तावांची शिफारस करेल. तदनंतर बदं पडलेल्या किंवा मान्यता रद्द केलेल्या किंवा काढून घेतलेल्या वसतिगृहाचे हस्तांतरण करण्याबाबत यथायोग्य निर्णय शासन स्तरावर घेतला जाईल व शासनाचा तो निर्णय अंतिम राहील. शासनाने मान्यता रद्द केलेले अथवा काढून घेतलेले किंवा काही कारणास्तव बंद झालेले वसितगृह विचारात घेऊन,दरवर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरु होण्यापूर्वी वसतीगृह हस्तांतरण आदेश शासनस्तरावरुन पारित केले जातील.

(२) विद्यार्थी संख्ये अभावी बंद पडलेली अनुदानित वसतिगृह पुन्हा त्याच ठिकाणी सुरु करण्यास परवानगी दिली जाणार नाही. तेथील प्रवेशित विद्यार्थ्यांचे प्रकरणपरत्वे लगतच्या अनुदानित वसतिगृहात समायोजन करण्याची व्यवस्था केली जाईल. सदरहु वसतिगृहाचे हस्तांतरण/ स्थलांतरण करण्याची आवश्यकता नाही.

(३) बंद पडलेल्या अथवा मान्यता रद्द केलेल्या वसतिगृहामधील मान्यता प्राप्त सर्व कर्मचाऱ्यांना सामावून घेण्याची जबाबदारी नविन संस्थेची राहिल. अनुदानित वसितगृह स्थलांतरणाच्या अनुषंगाने कोणत्याही नविन पदास मान्यता दिली जाणार नाही. अनुदानित वसतिगृहातील विद्यार्थीसंख्या कमी झाल्याने मान्यता रद्द केल्यास अशा अनुदानित वसतिगृहातील कर्मचाऱ्यांना इतर अनुदानित वसतिगृहात ज्येष्ठतेनुसार समायोजन केले जाईल.

(४) हस्तांतरण व स्थलांतरण झालेल्या ठिकाणी अनुदानित वसतिगृह शैक्षणिक वर्ष सुरु झाल्यापासून ३० दिवसांत सुरु करणे बंधनकारक राहील. विहित मुदतीत अनुदानित वसतिगृह सुरु न केल्यास सदर अनुदानित वसतिगृहाचे हस्तांतरण व स्थलांतरण आपोआप रद्द झाल्याचे समजण्यात येईल.

(५) बंद पडलेल्या अनुदानित वसतिगृहांतील सर्व मान्यता प्राप्त कर्मचाऱ्यांची नियुक्ती हस्तांतरीत व स्थलांतरीत झालेल्या अनुदानित वसतिगृहात केल्यास त्यांनी ३० दिवसांत तेथे रुजू होणे बंधनकारक राहील. जे कर्मचारी हस्तांतरीत झालेल्या अनुदानित वसतिगृहाच्या ठिकाणी उचित कारणांशिवाय ३० दिवसांच्या आत रुजू होणार नाहीत. अशा कर्मचाऱ्यांना तीन संधी दिल्या जातील. त्यानंतरही ते नियुक्तीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास त्यांना सेवेची आवश्यकता नाही असे समजून त्यांची सेवा समाप्त केली जाईल व अशा कर्मचाऱ्यांच्या रिक्त जागेवर त्या संस्थेमार्फत पदभरती करण्यात येईल.

(६) हस्तांतरीत व स्थलांतरीत झालेले अनुदानित वसतिगृह उत्तमरित्या संस्थेच्या स्वनिधीतून चालविणे ही जबाबदारी प्रामुख्याने संबंधित स्वयंसेवी संस्थेची राहील. देय बाबींवरील अनुज्ञेय खर्चाची प्रतिपूर्ती वेळोवेळी शासनाचे ध्येयधोरण व अनुदानाचे उपलब्धतेनुसार केली जाईल. अशा संमतीचे हमीपत्र संस्थेने सोबत जोडणे बंधनकारक राहील.

(७) शासनाच्या सामाजिक न्याय विभागाने यापूर्वी अर्जदार संस्थेची एखाद्या अनुदानित वसतिगृहाची मान्यता रद्द केली असल्यास अथवा मान्यता काढून घेतली असल्यास किंवा काही कारणास्तव अनुदानित वसतिगृह बंद पडले असल्यास पुन्हा अन्य संस्थेचे अनुदानित वसतिगृह अशा अर्जदार संस्थेकडे हस्तांतरण व स्थलांतरण करण्याबाबतचा निर्णय घेण्याचे अधिकार शासनास राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२९१४५००१९५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.06.29 14:56:03 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
६. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
११.सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
१२.जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३.निवड नस्ती (शिक्षण -२).